भाटघर (उजवी बाजू) प्रकल्पांतर्गत पुणे जिल्ह्यातील भोर तालुक्यातील मौजे संगमनेर, ब्राम्हणघर, लव्हेरी, आस्कवाडी व इतर पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०२०/१७६/प्र.क्र.६८/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १६ नोव्हेंबर, २०२१

वाचा-

१) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र:आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र:आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
३) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: संकिर्ण२०११/प्र.क्र.८०(भाग-२)/र-८, दि. २५/०७/२०१३
४) वित्त विभाग शा.नि.क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
५) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: आरपीए-२०१५/प्र.क्र.२१४/र-१, दि.२३/०९/२०१५.
६) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र: विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दि. १६/१२/२०१५.
७) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६.
८) वित्त विभाग शासन निर्णय क्र: अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.१४/१०/२०२१.
९) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र: पुनर्व/उपले/आर आर/२३९४/२०२०, दि. ०५/१०/२०२०.
१०) महसूल व वन विभाग शासन पत्र समक्रमांक, दि. २३/१०/२०२०.
११) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र: पुनर्व/उपले/आर आर/२४५१/२०२१, दि. ०२/०८/२०२१.
१२) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र: पुनर्व/उपले/आर आर/२५९१/२०२१, दि. १८/०८/२०२१.

प्रस्तावना -

भाटघर (उजवी बाजू) प्रकल्पांतर्गत पुणे जिल्ह्यातील भोर तालुक्यातील मौजे संगमनेर, ब्राम्हणघर ,लव्हेरी , आस्कवाडी व इतर पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांची अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेस्तव विभागीय आयुक्त, पुणे यांनी संदर्भाधिन क्र.९, ११ व १२ येथील पत्रांन्वये शासनास सादर केली होती.

२. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२)(अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/ २००८/विनियम, दि.१५.५.२००९ अन्वये प्रदान अधिकारानुसार सन १९७६ पूर्वीच्या प्रकल्पामुळे पुनर्वसित झालेल्या गावठाणांना नागरी सुविधा पुरविणे या योजनेअंतर्गत नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत शासन निर्णय क्र. संकिर्ण २०११/प्र.क्र.८०(भाग-२)/र-८, दि.२५/०७/२०१३ निर्गमित करण्यात आला आहे.

तद्नंतर वित्त विभागाने वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक ते पाच अंतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये संदर्भाधिन क्र. ४ व ७ येथील शासन निर्णयांन्वये सुधारणा केल्या आहेत. सदर सुधारणांनुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार विभागीय आयुक्त, पुणे यांच्याकडून प्राप्त प्रस्तावामध्ये

नमूद नागरी सुविधा कामांपैकी अनुज्ञेय असलेल्या नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

भाटघर (उजवी बाजू) प्रकल्पांतर्गत पुणे जिल्ह्यातील भोर तालुक्यातील खालील तक्त्यात नमूद पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांच्या एकूण रूपये ४,३५,३३,०००/- (अक्षरी रूपये चार कोटी पस्तीस लक्ष तेहतीस हजार फक्त) रकमेच्या अंदाजपत्रकांस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे-

| अ.क्र. | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | संगमनेर (माळवाडी) | समाजमंदिर बांधणे | १५,००,०००/- |
| २ | ब्राम्हणघर | समाजमंदिर बांधणे | १५,००,०००/- |
| ३ | लव्हेरी | समाजमंदिर बांधणे | १५,००,०००/- |
| ४ | लव्हेरी | अंतर्गत रस्ते कॉंक्रिटीकरण करणे | १५,००,०००/- |
| ५ | आस्कवाडी | समाजमंदिर बांधणे | २०,३३,०००/- |
| ६ | आस्कवाडी | अंतर्गत रस्ते कॉंक्रिटीकरण करणे | १०,००,०००/- |
| ७ | वाढाणे | समाजमंदिर बांधणे | ३०,००,०००/- |
| ८ | करंदी बु. (सावंतवाडी) | अंतर्गत रस्ते कॉंक्रिटीकरण करणे | २५,००,०००/- |
| ९ | करंदी बु. (वरखडेवाडी) | अंतर्गत रस्ते कॉंक्रिटीकरण करणे | १५,००,०००/- |
| १० | करंदी खु. (डावरेवाडी) | स्मशानभूमी पोहोचरस्ता डांबरीकरण करणे | २०,००,०००/- |
| ११ | करंदी खु. (सणसवाडी) | अंतर्गत रस्ते कॉंक्रिटीकरण करणे | २०,००,०००/- |
| १२ | कांबरे बु. चिकणेवाडी | समाजमंदिर बांधणे | १५,००,०००/- |
| १३ | कांबरे खु. खुळेवाडी (उंबरमाळ) | समाजमंदिर बांधणे | १५,००,०००/- |
| १४ | कुरुंजी | समाजमंदिर बांधणे | १५,००,०००/- |
| १५ | कुरुंजी | अंतर्गत रस्ते कॉंक्रिटीकरण करणे | २०,००,०००/- |
| १६ | कुरुंजी(शिळीमकरवाडी) | समाजमंदिर बांधणे | १०,००,०००/- |
| १७ | मळे | स्मशानभूमी पोहोचरस्ता कॉंक्रिटीकरण करणे | २५,००,०००/- |
| १८ | मळे | अंतर्गत रस्ते कॉंक्रिटीकरण करणे | ३०,००,०००/- |
| १९ | मळे (सुतारवाडी) | अंतर्गत रस्ते कॉंक्रिटीकरण करणे | १५,००,०००/- |
| २० | मळे (सुतारवाडी) | समाजमंदिर बांधणे | १५,००,०००/- |
| २१ | भाडवली | समाजमंदिर बांधणे | १५,००,०००/- |
| २२ | डेरे (खिळदेवाडी) | समाजमंदिर बांधणे | २०,००,०००/- |
| २३ | कुंबळे | कुंबळे ते निगडे रस्ता डांबरीकरण करणे | ४०,००,०००/- |
| | | **एकूण** | **४,३५,३३,०००/-** |

१) उपरोक्त नमूद पुनर्वसित गावे ही भाटघर धरणामुळे पुनर्वसित झाली आहेत तसेच प्रस्तावाधिन कामे यापूर्वी अन्य योजनेतून झालेली नाहीत याबाबत खातरजमा करून तद्‌नंतरच संबंधित कार्यकारी अभियंता यांनी कामांची निविदा प्रक्रिया सुरु करावी.

२) प्रस्तावात समाविष्ट असलेल्या कामांकरिता गौण खनिज स्वामित्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित कार्यन्वयन यंत्रणेची राहील.

३) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१ दि.०१/०८/२००९ व शासन परिपत्रक क्र.आरपीए-०१११/प्र.क्र.१८/र-१,दि.२८/३/२०११ अन्वये पुनर्वसित/विस्तारीत गावठाणातील नागरी सुविधा पुरविण्यासाठी निर्धारित करण्यात आलेल्या भौतिक मानकांनुसार काम करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकापेक्षा/विहीत मर्यादेपेक्षा जास्त होणार नाही याची संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांसाठीच्या अंदाजपत्रकांत दर्शविलेली कामनिहाय रक्कम तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेनुसार असावी. तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहीत कार्यपध्दतीनुसार पालन होईल, याची संबंधित अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम, १९९९ मधील कलम (१८) अन्वये प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर व त्याप्रमाणे जिल्हाधिकारी, पुणे यांचेकडून प्रमाणपत्र घेतल्यानंतर संबंधित जिल्हा परिषदेकडे तातडीने हस्तांतरित कराव्यात.

७) पुनर्वसन योजनेतून पुरविण्यात आलेल्या सदर सुविधा अन्य योजनेतून पुनश्चः पुरविल्या जाणार नाहीत, याची संबंधित विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तसेच संबंधित यंत्रणांनी दक्षता घ्यावी.

८) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित दर्जा राखला जाईल, याची प्रकल्प यंत्रणेने दक्षता घ्यावी.

९) सन १९७६ पूर्वीच्या प्रकल्पाने बाधित पुनर्वसित गावांना नागरी सुविधा पुरविणे या संदर्भात शासनाने वेळोवेळी विहित केलेली धोरणे, अटी/शर्ती इत्यादी बाबींचे अनुपालन करण्याची दक्षता घ्यावी.

१०) सदर अंदाजपत्रक अंतर्गत कामांची अंमलबजावणी करण्याकरिता कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण विभाग), पुणे, जि. पुणे हे उचित कार्यालय असल्याची खात्री करण्यात यावी.

२. <u>निविदा प्रक्रिया व कार्यारंभ आदेश :-</u>

**अ)** कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण विभाग), पुणे, जि. पुणे यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशांतील अटींची पूर्तता करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया तात्काळ सुरु करावी.

**ब)** प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांच्या निविदा प्रक्रियेस संबंधित पाटबंधारे विकास महामंडळ यांचेकडून पूर्वपरवानगी व मान्यता घेण्याची आवश्यकता असणार नाही.

**क)** प्रस्तावाधीन पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन देण्यात येणार असल्यामुळे निविदा स्वीकृतीनंतर कार्यारंभ आदेश देण्यासाठी, संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून निविदा सांकेतांक घेण्याची आवश्यकता नाही.

**ड)** कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण विभाग), पुणे, जि. पुणे यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर निविदा प्राप्त कामांसाठीचे कार्यारंभ आदेश देऊन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.

३. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण विभाग), पुणे, जि. पुणे यांनी उपरोक्त परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद केल्यानुसार सुरु करण्यात आलेल्या नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल (Work Progress Report)/ खर्चाच्या प्रगतीचा अहवाल (Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षाच्या कालावधीत सदर कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार "मागणी क्रमांक सी- १०, ४७०१- मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७)"या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी. त्या अनुषंगाने सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षाच्या मंजूर व उपलब्ध तरतूदीतून आवश्यक तेवढा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर विभागीय आयुक्त, पुणे यांच्यामार्फत प्रकल्प यंत्रणेस उपलब्ध करुन देण्यात येईल.

४. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक २०५/१४७५, दि.०८.१०.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२३११८०७५०६११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7,
pseudonym=CB263AE7A97BA5DB04805052B34A6E185702D5F9,
serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2021.12.31 18:09:11 +05'30'

**( संजय जगताप )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) पुणे विभाग, पुणे.
२. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, पुणे.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
४. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण विभाग), पुणे, जि. पुणे.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९. जलसंपदा विभाग/मोप्र-२. मंत्रालय, मुंबई.
१०. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन), पुणे.
११. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१० व अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग, कार्यासन १४७५,मंत्रालय, मुंबई.
१३. महसूल व वन विभाग,कक्ष अधिकारी ब-१, पी.ए.सी. कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती कार्यासन र-८,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई.

* * * * *